• • 1

20140822113522 8523

**महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित, मुबई या शासन अंगीकृत उपक्रमांस सन २००९-१० या आर्थिक वर्षात प्रादेशिक पर्यटन विकास योजनेतंर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय, क्रमांक टीडीएस २००९/७/प्र.क्र.१५५ पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांकः- १३ ऑगष्ट २००९.

**शासन निर्णय :**

पर्यटनस्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत मार्च २००९ च्या अधिवेशनात रुपये २६७२.०० लाख व जुन २००९ च्या अधिवेशनात रु. ५७७८.०० लाख मिळून रु. ८४५०.०० लाख इतकी तरतूद सन २००९-१० साठी अर्थसंकल्पित झाली आहे.

सन २००९-१० मध्ये प्रादेशिक पर्यटन विकास अंतर्गत अर्थसंकल्पित झालेल्या रुपये ८४५०.०० लाख निधीतून जिल्ह्यांमधील पर्यटन स्थळांच्या ठिकाणी विकास कामांना प्रशासकीय मान्यता देवून **रुपये ५९१०.००** लाख इतका निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करुन देण्यास शासन निर्णय समक्रमांक दि.१३.८.०९ अन्वये शासन मंजूरी दिली आहे. उर्वरित रक्कम **रुपये २५४०.०० लाख (रुपये : पंचवीस कोटी चाळीस लाख फक्त) (रुपये ८४५०.०० लाख वजा रुपये ५९१०.०० लाख )** इतका निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ या शासन अंगिकृत उपक्रमास पर्यटन विकासासाठी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देत आहे.

(रुपये : लाखात)

| अ.क्र. | जिल्हा | कामाचे ठिकाण व कामे | अंदाजित रक्कम | वितरीत रक्कम | कार्यान्वयीन यंत्रणा |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुंबई | महाकाली गुंफा, अंधेरी येथे पायाभूत सुविधा व परिसर विकास | १००.०० | १००.०० | म.प.वि.म. / म्हाडा |
| २ | मुंबई | महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित, डेक्कन ओडीसी सुधारणा व नुतनीकरण | ५००.०० | ५००.०० | म.प.वि.म. |
| ३ | रायगड | पेण, पनवेल, येथे प्रत्येकी - १ व महाड येथे -२ असे एकूण ५ पथदिवे (Higmast Lighting System) पर्यटकांच्या सोयीसाठी बसविणे. | ३७.५० | ३७.५० | म.प.वि.म. |
| | | **सर्व एकूण** | **६३७.५०** | **६३७.५०** | |

२. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केलेली रक्कम रु.२५४०.०० लाख इतक्या रकमेतून वर नमूद केलेल्या कामांना रु. ६३७.५० लाख इतका निधी खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात येत आहे. तसेच उर्वरित (रु. २५४०.०० वजा रु. ६३७.५० लाख) रु. १९०२.५० लाख इतका निधी महामंडळ जिल्हा स्तरावरील प्रस्तावाची छाननी करुन पर्यटन विकास कामासाठी उपलब्ध करुन देईल. हा निधी खालील अटी व शर्तीवर महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास अदा करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

१) जिल्हा स्तरावरुन प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करुन जिल्हयातील पर्यटन विकास कामासाठी शासनाची मान्यता घेऊन निधी वितरीत करण्यात येईल.

२) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. त्याप्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिका-यांच्या प्रत्यावर्तनांचा सक्षम प्रशासकीय व वित्तिय मान्यात घेणे आवश्यक आहे.

३) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याबाबतची सर्व जबाबदारी संबंधित कार्यान्वित यंत्रणेवर राहील आणि जादा खर्चाची प्रतिपूर्ती शासनाकडून केली जाणार नाही.

४) अशा प्रत्येक योजनेच्या करावयाच्या बांधकामाच्या संदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवापुरवठा कराराबाबत वित्त नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती अंवलबिणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक वित्त विभाग,क्र.संकिर्ण १००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र.५/दिनांक ६/२/२००२च्या सुचनांचे काटेकोरपणे पालन होईलयाची खंबरदारी संबंधित अंमलबजावणीद्वारे तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.डीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दि.१०.९.२००१ मधील उपायायोजनेची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

५) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियतांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

६) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ/जिल्हाधिकाऱ्यांवर राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

७) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च मार्च,२०१०पर्यत करावा व मंजूर कामे पूर्ण करावीत.

८) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

९) उपरोक्त सर्व कामांना तांत्रिक मान्यता, यापूर्वी घेतली नसल्यास, काम सुरु करण्यापूर्व प्राप्त करुन घेण्यात यावी. ज्या प्रस्तावांना तांत्रिक मान्यता देताना काही अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत अशा अटी व शर्तीची आधी पूर्तता करणे बंधनकारक राहील.

१०) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

११) योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१२) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणा-या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१३) सदर कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यात शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

१४) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २००९-१०या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष "३४५२-पर्यटन मागणी क्र. झेड्डी-४-०१ पर्यटनासाठी पायाभूत सुविधा १०१ - पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणी मूलभूत सुविधासाठी अनुदान (३४५२ १९५ ८) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) " या लेखा शिर्षाखालील मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत ) सहाय्यक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता श्री. आ. बा. डमाळे, कक्ष अधिकारी, (पर्यटन) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्रीमती मीना जोशी, उपसचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांनी वरील निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी मुंबई येथून महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या नावावर धनादेशाद्वारे काढून संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

१५) यासंदर्भात होणाऱ्या खर्चाचा मेळ महालेखापालांच्या कार्यालयाशी घालून त्याबाबतचे विवरणपत्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील नियमांप्रमाणे शासनास सादर करावे.

१६) हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय क्र. विअप्र१०००/प्र.क्र.४६/२००१, दि.११ जुलै २००१ मधील अनु. क्र. २७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

आ.बा.डमाळे

**(आ.बा.डमाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.
जिल्हाधिकारी, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (का.१४११ / १४४४) मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (का. व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-११) मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी, सां.का.-(अर्थसं), पर्यटन व सां.का.विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.